सोलापूर महानगरपालिकेच्या महासभेने केलेला ठराव क्र.४१ दि.१६.०९.२०१७, अंतिमत: विखंडीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सोमपा-२०१८/प्र.क्र.११/नवि-१८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८.०६.२०१८

**संदर्भ:-** १) आयुक्त, सोलापूर महानगरपालिका यांचे पत्र क्र. न.आ./वै/१८९, दि.०५.१०.२०१७
२) शासन निर्णय समक्रमांक दि.२१.०२.२०१८
३) आयुक्त, सोलापूर महानगरपालिका यांचे पत्र क्रमांक नअ/भूवमा/२१२६, दि.२३.०३.२०१८

**प्रस्तावना:-**

सोलापूर महानगरपालिकेच्या मालकीचे व्यापार संकुल असून त्यामधील मेजर व मिनी शॉपिंग सेंटरमध्ये एकूण १३८६ गाळे आहेत. सदर गाळ्यासंदर्भात सोलापूर महानगरपालिका महासभेने दि.१६.०९.२०१७ रोजी झालेल्या महासभेत, "सोलापूर महानगरपालिकेच्या मालकीचे मेजर व मिनी शॉपिंग सेंटर मधील गाळ्यांचे भाडेपट्टा हे रेडीरेकनर दरानुसार करण्यास व ज्यांची मुदत संपलेली आहे, अशा गाळेधारकांच्यावर कारवाई न करता मुदतवाढीसाठीचे ज्या गाळेधारकांनी अर्ज दाखल केलेले आहेत, त्यांच्याकडून रितसर फी आकारणी करून मुदतवाढ देणेस ही सभा मान्यता देत आहे.", असा ठराव बहुमताने मंजूर करण्यात आला. सदर ठराव हा सोलापूर महानगरपालिकेच्या आर्थिक हितास बाधा आणणारा असल्याने विखंडीत करण्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त, सोलापूर महानगरपालिका यांनी त्यांच्या दि.०५.१०.२०१७ च्या पत्रान्वये शासनास पाठविला होता. त्यावर विचार करून महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील तरतुदीनुसार सदरचा ठराव निलंबित करण्याबाबत शासनाने निर्णय घेतला. सदर निर्णयाबाबत संबंधितांना काही अभिवेदन करावयाचे असल्यास निलंबन आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत करण्याचे दिनांक २१/२/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये कळविण्यात आले होते. आयुक्त,सोलापूर महानगरपालिका यांचे दिनांक २३/३/२०१८ रोजीच्या पत्रान्वये अभिवेदन शासनास प्राप्त झाले. तथापि, सोलापूर महानगरपालिका अथवा सचिव, सोलापूर महानगरपालिका यांचे कोणतेही अभिवेदन विहित कालावधीत शासनास प्राप्त झालेले नाही. सदर बाब विचारात घेऊन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ७९ (ड) मध्ये अशी तरतुद आहे की, महानगरपालिकेस मालकीची कोणतीही स्थावर मालमत्ता भाडेपट्याने देताना त्याबाबतचे अधिमूल्य, भाडे हे चालुबाजार किंमतीपेक्षा (Current Market Value) कमी असता कामा नये. या तरतुदीनुसार प्रशासनाने योग्य तो प्रस्ताव त्यांच्या दि.१४.०६.२०१७ च्या टिप्पणीनुसार महासभेस विचारार्थ सादर केला होता. तथापि, तो मंजूर न करता महासभेने दि.१६.०९.२०१७ च्या बैठकीत

अधिनियमातील तरतुदीशी विसंगत ठराव क्रमांक ४१ मंजूर केला आहे. सदरचा मंजूर केलेला ठराव क्र. ४१ हा महानगरपालिकेच्या आर्थिक हितास बाधक असल्याने व व्यापक लोकहिताच्या विरूध्द असल्याने तसेच महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ७९ (ड) मधील तरतुदीशी विसंगत असल्याने आणि प्रशासनाच्या प्रस्तावानुसार नसल्याने सदर ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करण्यात येत आहे. याप्रकरणी महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ७९ (ड) मधील तरतुदीचे पालन होईल, या दृष्टीने योग्य ती कार्यवाही अवलंबण्याबाबत महानगरपालिकेस कळविण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२८१८११२०५२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Satish J Moghe
Date: 2018.06.28 18:17:25 +05'30'

**( सतीश मोघे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महापौर, सोलापूर महानगरपालिका, सोलापूर
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. राज्यमंत्री, नगर विकास विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, सोलापूर महानगरपालिका, सोलापूर
५) महापालिका सचिव, सोलापूर महानगरपालिका
६) निवड नस्ती (नवि-१८), नगर विकास विभाग.